<u>**अतारांकित प्रश्नोत्तरांची सातवी यादी**</u>

# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**गृह विभागाच्या आरमार दलाकडे अपुरे कर्मचारी असल्याबाबत**

**(१) ६२५५ (०९-०४-२०१५). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २००८ च्या अहवालानुसार राज्याच्या गृह विभागाच्या आरमार दलाकडे ९००० कर्मचाऱ्यांची आवश्यकता असल्याचे नमुद करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सद्य:स्थितीत दीड लाख शस्त्रांच्या निगराणीचा भार केवळ ५७७ कर्मचा-यांवर असल्याची बाब माहे जानेवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, आरमार दलाचे आधुनिकीकरण करुन कर्मचा-यांची भरती करणे संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-११-२०१७) :** (१) व (२) राज्य पोलीस विभागामध्ये शस्त्रांच्या निगराणीसाठी पोलीस कर्मचारी यांची ६०५ पदे मंजूर असून प्रत्यक्षात ६५३ पोलीस कर्मचारी उपलब्ध करुन देण्यात आले आहेत.

(३) मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद यांनी जनहित याचिका क्र. ०४/२०१५ मध्ये दिलेल्या न्याय निर्णयाच्या अनुषंगाने आयुधिक पोलीस दलाचा स्वतंत्र निर्माण करणेबाबतचा प्रस्ताव पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील लहान मुलांमधील कुपोषणाची समस्या सोडविण्यासाठी सायन रुग्णालयात स्वतंत्र बाहयरुग्ण विभाग सुरु करण्याबाबत

**(२) ८८३७ (३१-०७-२०१५). श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील लहान मुलांमधील कुपोषणाची समस्या सोडविण्याबाबत सायन रुग्णालयात स्वतंत्र बाहयरुग्ण विभाग सुरु करण्यात आला आहे या विभागात मेडिकल न्यूट्रिशन थेरेपीच्या (एमएनटी) सहाय्याने कुपोषित मुलांवर उपचार केले जाणार असल्याचे माहे एप्रिल, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या न्यूट्रिशन थेरेपीचा (एमएनटी) प्रयोग राज्यातील सर्व शासकीय रुग्णालयात राबविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०२-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) न्यूट्रिशन थेरेपीच्या (एमएनटी) बाबत राज्यातील रुग्णालयात सदर थेरेपी राबविण्याबाबत सदर थेरेपी राबविण्याबाबत कोणतेही शासकीय आदेश निर्गमित झालेले नाही.

मात्र राज्यातील सर्व शासकीय रुग्णालयात राबविण्यात येणाऱ्या विविध योजना उदा. पोषण पुनर्वसन केंद्र, बाल उपचार केंद्रात कुपोषित बालकांना उपचारात्मक आहार देण्यात येतो.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**परभणी जिल्हयातील इन्फ्रा-२ च्या कामाबाबत**

**(३) १५०४५ (२७-०४-२०१६). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्हयातील इन्फ्रा-२ अंतर्गत मंजूर असलेल्या कामांना निधी उपलब्ध करून देऊनही विहित मुदतीत कंत्राटदारांनी कामे पुर्ण न केल्याने त्यांच्याविरुध्द कारवाई करण्यात यावी अशी मागणी स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी मा.ऊर्जा मंत्री यांच्याकडे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान लेखी निवदेनाव्दारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विहित मुदतीत कामे न करणाऱ्या संबंधिंत कंत्राटदारांच्या निविदा रद्द करणे, त्यांना काळ्या यादीत टाकणे तसेच प्रकल्पाची वाढलेली किंमत त्यांच्याकडून वसूल करणे व इतर कारवाई तसेच त्यांचे संनियंत्रण करणाऱ्या जबाबदार अधिकाऱ्यांविरूध्द निलंबनाची कार्यवाही करणे आदी कारवाई मा.मंत्री महोदयांच्या स्तरावरून करण्यात आल्या आहेत काय,
(३) असल्यास, दोषी कंत्राटदार व अधिकारी यांच्याविरुध्द कारवाई करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (२०-११-२०१७) :** (१) यासंबंधी स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी दिनांक १०/०२/२०१६ च्या पत्रान्वये मा.ऊर्जा मंत्री यांच्याकडे निवेदन दिले आहे.
(२) व (३) होय.

परभणी जिल्ह्यातील इन्फ्रा-२ योजनेचे काम मे.सुदर्शन इलेक्ट्रिकल्स या कंत्राटदारास दिनांक ०६/०९/२०१४ रोजी देण्यात आले होते. परंतु कंत्राटदाराने मासिक उद्दिष्टाप्रमाणे काम न केल्यामुळे त्यांना दोन वेळा नियमानुसार नोटीस बजावण्यात आल्या. त्यानंतरही मासिक उद्दिष्टाप्रमाणे काम न झाल्याने "नोटीस टु टर्मिनेट" देण्यात आली. सदर नोटीसा देऊन सुध्दा कामाच्या प्रगतीत सुधारणा आढळून न आल्याने कंत्राट अंशत: रद्द करुन स्थानिक पातळीवर कंत्राटदाराने हाती न घेतलेल्या (Untouched) कामाच्या ६ निविदा काढण्यात आल्या असून कामे प्रगतीपथावर आहेत. तसेच कामाच्या विलंबाबद्दल कंत्राटातील तरतुदीनुसार दंड आकारण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील सर्व महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रातील फेरीवाल्यांच्या अतिक्रमणापासून पदपथ मुक्त करणेबाबत**

**(४) १७०८९ (२८-०४-२०१६). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईसह राज्यातील सर्व महानगरपालिका व नगरपालिका क्षेत्रातील फेरीवाल्यांच्या अतिक्रमणापासून पदपथ मुक्त करणे, त्यांचे नियमन व नियंत्रण करणारे सर्वसमावेशक धोरण अंमलात आणण्याचा प्रस्ताव अनेक महिन्यापासून शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत निर्णय घेण्यात आला आहे काय, निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, बेकायदेशीर फेरीवाल्यांचा उपद्रव वाढत असून तसेच रस्त्यावर बेकायदेशीरपणे खाद्यपदार्थ शिजवून त्यांच्या होणाऱ्या विक्रीमुळे जनतेच्या आरोग्यावर त्याचा विपरीत परिणाम होत असल्यामुळे नविन फेरीवाला धोरणाची अंमलबजावणी लवकर करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१८-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२), (३) व (४) केंद्र शासनाने दिनांक १ मे, २०१४ पासून पथविक्रेता (उपजीविका संरक्षण आणि पथविक्रीचे विनियमन) अधिनियम, २०१४ लागू केला आहे.

सदर अधिनियमातील कलम ३६(१) नुसार राज्य शासनाने महाराष्ट्र पथविक्रेता (उपजीविका संरक्षण व पथविक्री विनियमन) (महाराष्ट्र) नियम, २०१६, दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी नियमावली व कलम ३८(१) नुसार दिनांक ९ जानेवारी, २०१७ रोजी पथविक्रेता (उपजीविकेचे संरक्षण व पथविक्री विनियमन), २०१७ योजना प्रसिध्द केली आहे.

सदर योजनेतील तरतुदीनुसार महानगरपालिकेमार्फत पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

**राज्यातील अनुदानित वसतिगृहासाठी स्वतंत्र स्त्री अधिक्षक पदांच्या नियुक्तीबाबत**

**(५) २००६० (१६-०८-२०१६). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक १६३०१ ला दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती/भटक्या जमाती व इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक विभागातील माध्यमिक आश्रमशाळांसाठी मंजुर करण्यात आलेल्या ३८ महिला अधिक्षकांच्या पदांपैकी प्रस्ताव प्राप्त झालेल्या ९ आश्रमशाळांमध्ये महिला अधिक्षकांच्या नियुक्तीस प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नाशिक यांनी मंजुरी दिलेली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मंजुरी प्रदान करण्यात आलेल्या सर्वच ३८ पदांवर महिला अधिक्षकांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, केव्हापर्यंत मंजुरी मिळणे अपेक्षित आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१६-११-२०१७) :** (१) होय, अंशत: खरे आहे.

(२) व (३) नाही.

नाशिक विभागातील माध्यमिक आश्रमशाळांसाठी ३८ महिला अधिक्षकांची पदे मंजुर करण्यात आली आहेत.

त्यापैकी प्राप्त झालेल्या ११ प्रस्तावातील ८ आश्रमशाळांमध्ये महिला अधिक्षकांच्या नियुक्ती प्रस्तावास प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, नाशिक यांनी मंजुरी दिलेली आहे आणि ३ प्रस्ताव त्रुटी पूर्ततेसाठी परत केले आहेत.

---

## आमदार आणि खासदार यांच्या स्थानिक विकास निधींतर्गत होणाऱ्या जलयुक्त शिवार योजनेत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(६) २०२८१ (१८-०८-२०१६). श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात जलयुक्त शिवार योजनेसाठी आमदार आणि खासदार आपला स्थानिक विकास निधी देत असले तरी या कामामध्ये गैरव्यवहार होत असल्याचे निरिक्षण ऑब्झर्व्हर रिसर्च फाऊंडेशन या संस्थेने केलेल्या पाहणीनुसार दिनांक ६ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लोकसहभागातून होणारी कामे अत्यंत कमी खर्चात होत असतांना आमदार व खासदार निधीच्या कामात प्रचंड प्रमाणात लुट सुरु आहे असे या संस्थेने दिलेल्या अहवालात नमूद करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी करुन शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०२-११-२०१७) :** (१) अशी बाब आढळली नाही.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नागपूर शहरातील एका रुग्णाची टॉर्चच्या उजेडात शस्त्रक्रिया करावी लागल्याबाबत**

**(७) २१४६० (२१-०४-२०१७). श्री.मितेश भांगडिया, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहरातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात (मेडीकल) रुग्णालयातील विद्युत पुरवठा खंडीत झाल्यामुळे एका रुग्णाची टॉर्चच्या उजेडात शस्त्रक्रिया करावी लागल्याची घटना दिनांक २२ एप्रिल, २०१६ वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात त्या दिवशी तीन ते चार वेळा सतत विद्युत पुरवठा खंडीत झालेला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर रुग्णालयाकडे जनरेटर असून ते सुरू व्हायला वेळ लागल्यामुळे स्थानिक डॉक्टरांना टॉर्चच्या उजेडात प्रसूती शस्त्रक्रिया करावी लागली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयातील शस्त्रक्रिया गृहातील जनरेटर व्यवस्था अत्याधुनिक करण्यासह मुबलकता वाढविण्यात येणार आहे काय,

(५) नसल्यास, पर्यायी उपाययोजना काय आहे ?

**श्री. गिरीष महाजन (०३-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे नाही.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेत दिनांक २२/४/२०१६ रोजी दुपारी ३.४५ ते ५.१५ या दरम्यान फक्त एकदा विद्युत पुरवठा खंडीत झाला होता.

(३) हे खरे नाही.

(४) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर करीता पर्यायी व्यवस्था म्हणून अत्याधुनिक जनरेटर उपलब्ध असून ते पुरेशा प्रमाणात आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वैद्यकिय आस्थापना कायद्याच्या मसुद्याबाबत सुधारणा करण्याबाबत

**(८) २२००५ (२१-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.अनिल भोसले, श्री.विक्रम काळे, श्री.ख्वाजा बेग, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित : तारांकित प्रश्न क्रमांक ६९६७ ला दिनांक २८ जुलै, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात खाजगी रुग्णालयांकडून होणारी फसवणूक थांबविण्यासाठी रुग्णालयांवर नियंत्रण आणणाऱ्या वैद्यकीय आस्थापना कायद्याचा मसुदा शासनाने तयार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कायद्यात सुधारणा करण्याची मागणी मुंबईचे स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांच्याकडे दिनांक २१ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त मागणीच्या अनुषंगाने कायदा मंजुरीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०३-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) सदर पत्राची प्रत शासकिय अभिलेख्यामध्ये आढळली नाही.

(३) सदर कायदयाच्या मंजुरी बाबतची कार्यवाही सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई मधील बोगस डॉक्टरांवर कारवाई करण्याबाबत

**(९) २३८५२ (२१-०४-२०१७). श्री.जयंत पाटील, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे : तारांकित प्रश्न क्रमांक ११२८९ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईत सन २०१४ ते २०१६ या तीन वर्षात १४३ बोगस डॉक्टर असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, १४३ बोगस डॉक्टरांपैकी फक्त ४ डॉक्टरांवर कारवाई करण्यात आली असून ३ बोगस डॉक्टरांवर न्यायालयात खटले भरण्यात आलेले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उर्वरित १३९ बोगस डॉक्टरांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०२-११-२०१७)** :(१) हे अंशत: खरे आहे.

मुंबईमध्ये सन २०१४ ते २०१६ या तीन वर्षात एकूण ७० बोगस वैद्यकीय व्यावसायिकांवर कारवाई करण्यात आली असल्याचे निदर्शनास आले आहे.

सन २०१४ मध्ये - ७ गुन्हे

सन २०१५ मध्ये - ४९ गुन्हे

सन २०१६ मध्ये - १४ गुन्हे

(२) नाही, हे खरे नाही.

सन २०१४ ते २०१६ या काळात एकूण ७० बोगस डॉक्टर्स विरुध्द गुन्हे नोंद करुन कारवाई करण्यात आली.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सोलापूर येथील शासकीय कर्मचाऱ्यांना जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबत

**(१०) २५५७० (२१-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्री.अशोक उर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर येथील शासकीय कर्मचाऱ्यांना जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करावी या प्रमुख मागणीसाठी काही कामगार संघटनांनी जिल्हाधिकारी, सोलापूर कार्यालयावर मोर्चा काढल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या मोर्चाची दखल घेत शासनाने शासकीय कर्मचाऱ्यांना जुनी पेन्शन योजना लागू करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (३१-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) राज्य शासनाच्या सेवेत दिनांक १/११/२००५ नंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांना नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शासनाने मंत्रिमंडळाच्या मान्यतेने घेतला आहे. हा निर्णय केंद्र शासनाच्या धतीवर घेण्यात आला आहे.

राज्य शासनाने घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार नवीन योजनेकरीता राज्य शासन केंद्र शासनास सामिल झाले असून या योजनेंतर्गत जमा असलेली रक्कम केंद्रीय देखभाल अभिकरणाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही झाली आहे. त्यामुळे शासनाने घेतलेला धोरणात्मक निर्णय रद्द करुन राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना जुनी निवृतीवेतन योजना लागू करण्यासंदर्भात सध्या प्रयोजन नाही.

---

## सातारा जिल्हयातील जुन्या पाझर तलावांमधील गाळ काढून खोलीकरण करण्याबाबत

**(११) २५५८६ (२०-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या यादी क्रमांक ३ मधील प्रश्न क्रमांक १५४६६ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सातारा जिल्हयात सन १९७२ मध्ये बांधलेले ४०० पाझर तलाव गाळ व

मातीने भरलेले असल्याने पाणीसाठा होत नाही व कोरडे होत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तलावातील गाळ काढून खोलीकरण करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०१-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सातारा जिल्हयात जलयुक्त शिवार अभियानांतर्गत डिझेलचा पुरवठा करून लोकसहभागातून गाळ काढण्यात येत असून आतापर्यंत १०८ तलावातून १२ हजार ब्रास गाळ काढण्यात आला आहे. उर्वरित तलावातील गाळ काढण्याचे काम टप्प्याटप्प्याने प्रगतीत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहर व ग्रामीण विभागात तीन हजाराहून अधिक कार्यरत परिचारिका आरोग्य विम्यापासून वंचित असल्याबाबत

**(१२) २६८२१ (१७-०४-२०१७). श्री.अनिल भोसले, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे शहर व ग्रामीण विभागात तीन हजारांहून अधिक परिचारिका कार्यरत आहेत, परंतु सदर परिचारिका आरोग्य विमा संरक्षणापासून गेले अनेक वर्ष वंचित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर परिचारिका आरोग्य विमा संरक्षणापासून वंचित राहण्याची सर्वसाधारण कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन परिचारिकांना आरोग्य विमा संरक्षण देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२३-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही. वैद्यकीय शिक्षण विभागाच्या अखत्यारित पुणे शहरातील ससून सर्वोपचार रुग्णालय येत असून आरोग्य विमा संरक्षणाबाबत महाराष्ट्र गव्हर्नमेंट नर्सेस फेडरेशन या संघटनेच्या मागणीनुसार मा.मंत्री, वैद्यकीय शिक्षण यांच्यासोबत दिनांक ०५/०५/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत सदर संघटनेने आरोग्य विमा लागू करण्याबाबत प्रस्ताव सादर करावा, असे ठरले होते. तथापि, सदर प्रस्ताव अद्याप अप्राप्त आहे.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**पंतप्रधान आवास योजनेबाबत**

**(१३) २६८४२ (१३-०४-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.अनिल भोसले, ॲड.जयदेव गायकवाड, श्री.रामराव वडकुते, ॲड.अनिल परब, श्री.सुनिल तटकरे, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.रविंद्र फाटक, ॲड.राहुल नार्वेकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.प्रकाश गजभिये, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सर्वांसाठी घरे या संकल्पनेतून राबविण्यात येत असलेल्या पंतप्रधान आवास योजनेतून कोकण म्हाडा ने आर्थिकदृष्टया दुर्बल आणि अल्प उत्पन्न गटाकरीता घरे बांधण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोकण म्हाडा कोणकोणत्या शहरात सदरहू घरे बांधणार आहे व या गृह प्रकल्प योजनेस केव्हापासून सुरुवात केली जाणार आहे,

(३) असल्यास, ठाणे आणि कल्याण तालुक्यात सर्वांसाठी घरे या संकल्पनेतून राबविण्यात येत असलेल्या पंतप्रधान आवास योजनेतून कोकण म्हाडाने आर्थिकदृष्टया दुर्बल आणि अल्प उत्पन्न गटाकरीता सुमारे ३२ हजार ७३४ घरे बांधण्याचा निर्णय माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला

आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदरहू घरे ही गायरान जमिनीवर बांधण्यात येणार असून त्या जमिनी म्हाडाच्या ताब्यात देण्यासाठी हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत काय, तसेच या योजनेची केंव्हापासून अंमलबजावणी करण्यात येणार आहे व या योजनेतून किती लाभार्थींना घरे मिळणार आहेत,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. प्रकाश महेता (२७-११-२०१७) :** (१) होय.
(२) सदर घरे ठाणे जिल्हयातील भंडार्ली, गोठेघर, ता.ठाणे तसेच शिरढोण, ता.कल्याण येथे बांधण्यात येणार आहे.
(३) होय.
(४) सदर जमिनीचा ताबा देण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, ठाणे यांनी दिनांक ११/०१/२०१७ रोजी आदेश दिले आहेत, तसेच योजनेच्या कामासाठी कंत्राटदाराची नियुक्ती करण्यात आली असून कंत्राटदारास कार्यादेश निर्गमित करण्यात आले आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर मेडीकल महाविद्यालय परिसरातील मुख्य इमारतीच्या मागील भागात अस्वच्छता निर्माण झाल्याबाबत

**(१४) २६९५७ (१७-०४-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर मेडीकल महाविद्यालय परिसरातील मुख्य इमारतीच्या मागील भागात मोठया प्रमाणात अस्वच्छता व कच-यांचे ढिगारे निर्माण झाल्याने रूग्णालयातील रूग्णांचे आरोग्य धोक्यात असल्याचे दिनांक ३ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे कोणती आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०९-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**नागपूर सोमवार पेठ येथील विमा योजना कामगार रूग्णालयात सोई सुविधा व रिक्त पदे भरण्याबाबत**

**(१५) २७०२३ (१७-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर सोमवार पेठ येथील कामगार विमा योजना धारक व त्यांचे कुटूंबियांसाठी असलेल्या कामगार विमा रूग्णालयात आरोग्य सुविधेचा अभाव असून तेथे कर्मचा-यांची १८० पदे रिक्त असल्याचे दिनांक २९ नोव्हेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर कामगार विमा रूग्णालयात सोई सुविधा देण्याबाबत व कामगारांची रिक्त पदे भरण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (३१-१०-२०१७) :** (१) हे अंशत: खरं आहे.

राकावियो रुग्णालय नागपूर येथे एकूण ३३२ मंजूर पदे असून त्यापैकी सद्य:स्थितीत १५४ पदे भरलेली व १७८ पदे रिक्त आहेत.

सदर रुग्णालयात विमा रुग्णांना वैद्यकीय सुविधा पुरविताना अडथळा निर्माण होऊ नये याकरीता खाजगी प्रयोगशाळा व तपासणी केंद्रामार्फत CGHS दराने विमा रुग्णांच्या रक्तांच्या विशेष तपासण्या व सोनोग्राफी करण्यात येत असून राकावि महामंडळामार्फत वेळोवेळी १ वर्षाच्या कालावधी करीता ताप्तुरत्या स्वरुपात अंशकालीन विशेषज्ञांची व शासनामार्फत बंधपत्रित अधिकारी व परिचारिकांची नियुक्ती करण्यात येते.

सद्य:स्थितीत सदर रुग्णालयाकरीता राकावि महामंडळामार्फत अस्थिव्यंग शल्यचिकित्सक, शरीर विकृती शास्त्रज्ञ, कान नाक घसा व

भिषक (उरो) या चार अंशकालीन विशेषज्ञांची व शासनामार्फत ०६ बंधपत्रित वैद्यकीय अधिकारी व १३ बंधपत्रित परिचारिकांची नियुक्ती करण्यात आली आहे.

(२) राकावि योजना राज्य कार्यकारी समितीच्या दि. २९/०३/२०१६ रोजी झालेल्या ५ व्या बैठकीत राकावियो रुग्णालय नागपूर करीता एकूण १२ मोठ्या प्रकारची वैद्यकीय उपकरणे व यंत्रसामुग्री खरेदी करीता तत्वत: मान्यता दिली असून यासंदर्भात पुढील कार्यवाही सुरु आहे.

शासन स्तरावरील विभागीय पदोन्नती समितीच्या दि. १४/०८/२०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत एकूण १२ पदे पदोन्नतीने भरण्याबाबत निश्चित झाले आहे.

एकूण ३७ रिक्त पदे भरण्याबाबत दि. १७/०७/२०१७ रोजी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला मागणीपत्र पाठविण्यात आले असून उर्वरित संवर्गाच्या रिक्त पदांबाबत कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्याच्या बांधकाम नियमन आणि विकास कायद्यातील तरतुदीबाबत**

**(१६) २७०४७ (१३-०४-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) संसदेने संमत केलेल्या बांधकाम नियमन आणि विकास कायद्यात विकासक धार्जीणे बदल केल्यास जनक्षोभ उसळण्याचा इशारा मा.केंद्रीय गृहनिर्माण आणि शहरविकास मंत्र्यानी राज्यांना माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान दिला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या कायद्याच्या अनुषंगाने राज्याने बनवलेल्या नियमाच्या मसुद्यात अनेक विकासक धार्जीण्या तरतूदी करण्यात आलेल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, जनतेकडून मागविण्यात आलेल्या सूचना व हरकतीमध्ये नेमक्या कोणत्या हरकती घेण्यात आलेल्या आहेत,

(४) असल्यास, जनतेने घेतलेल्या हरकती लक्षात घेवून नियमाच्या मसुद्यात त्याप्रमाणे दुरुस्त्या करण्यात येणार आहेत काय,

(५) असल्यास, या नियमाचा मसुधा अंतिम होण्यासाठी आणखी किती कालावधी अपेक्षित आहे ?

**श्री. प्रकाश महेता (१३-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

तथापि, दि. १७/०१/२०१७ रोजी नवी दिल्ली येथे स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ च्या अंमलबजावणी संदर्भात राज्यांनी केलल्या कार्यवाहीच्या आढाव्याकरिता आयोजित करण्यात आलेल्या बैठकीमध्ये राज्य शासन तयार करत असलेले नियम केंद्रिय अधिनियमाशी सुसंगत ठेवावयाच्या सूचना देण्यात आल्या होत्या.

(२) नाही.

(३), (४) व (५) राज्य शासनाद्वारे दि. ०८/१२/२०१६ रोजी अधिसूचनेचे प्रारुप नियम प्रसिध्द करण्यात आले होते व त्यासंदर्भात जनतेकडून हरकती व सूचना मागविण्यात आल्या होत्या.

विहित कालावधीमध्ये प्राप्त झालेल्या हरकती व सूचनासंदर्भात सारासार विचार करुन, मसुद्यामध्ये योग्य त्या दुरुस्त्या करुन खाली नमूद केलेले ०५ नियम अंतिमत: अधिसूचित करण्यात आले आहेत :-

(अ) महाराष्ट्र स्थावर संपदा (विनियमन व विकास) (स्थावर संपदा प्रकल्पांची नोंदणी, स्थावर संपदा अभिकर्त्याची नोंदणी, व्याजदर आणि संकेत स्थळावर त्याचे प्रकटन) नियम, २०१७, दि. २१/०४/२०१७ रोजी प्रसिध्द

(ब) महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण अधिकारी व कर्मचारी (नियुक्ती व इतर सेवाशर्ती) नियम, २०१७ , दि. १७/०४/२०१७ रोजी प्रसिध्द.

(क) महाराष्ट्र स्थावर संपदा अपिल न्यायाधिकरण अधिकारी व कर्मचारी (नियुक्ती व इतर सेवाशर्ती) नियम, २०१७, दि. २०/०४/२०१७ रोजी प्रसिध्द.

(ड) महाराष्ट्र स्थावर संपदा (विनियमन व विकास) (व्याज शास्ती, नुकसानभरपाई व देय दंड यांची वसूली तक्रारी व अपिल इत्यादी नमूने नियम, २०१७, दि. १९/०४/२०१७ रोजी प्रसिध्द.

(इ) महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण (वार्षिक लेखा विवरणपत्राचे नमुने व वार्षिक अहवाल) नियम, २०१७, दि. १७/०४/२०१७ रोजी प्रसिध्द.

---

**नागपूर सुपर स्पेशालिटी व शासकिय वैद्यकिय महाविद्यालयाला यंत्रसामुग्रीच्या दुरूस्तीकरीता निधीची तरतूद करण्याबाबत**

**(१७) २७०८९ (१७-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर सुपर स्पेशालिटी व शासकिय वैद्यकिय महाविद्यालयाला यंत्रसामुग्रीच्या दुरूस्तीकरीता अडीच कोटी रूपयांची गरज असताना शासनाकडून दरवर्षी रुपये ८ ते १० लाख देण्यात येत असल्याचे दिनांक ७ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर अपूऱ्या निधीच्या कमतरतेमुळे १९९ प्रकारची यंत्रसामुग्री दुरूस्ती करण्यास अडचणी निर्माण होत असून वारंवार यंत्र बंद पडत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निधी उपलब्ध करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०२-११-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही

---

**राज्यातील शेतकऱ्यांच्या कृषी पंपांना वीज जोडण्या देण्याबाबत**

**(१८) २८००४ (१३-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक १९३३१ ला दिनांक १९ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शेतकऱ्यांनी कृषिपंप वीज जोडणी मिळण्यासाठी मे, २०१६ अखेर अर्ज व अनामत रक्कम भरूनही १ लाख ७३ हजार ९९१ शेतकरी वीज जोडणी पासून वंचित असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त शेतकऱ्यांच्या प्रलंबित प्रस्तावांना मंजूरी देवून प्रत्यक्ष वीज जोडणी देण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (२०-११-२०१७) :** (१) हे खरे आहे.

राज्यात मार्च, २०१७ अखेर २,०५,५९० कृषीपंप पैसे भरुन प्रलंबित होते.

(२) राज्यात सन २०१६-१७ मध्ये विदर्भ मराठवाडा विशेष योजना, कृषीपंप अनुशेष योजना, पायाभूत आराखडा-२ योजना व जिल्हा वार्षिक योजना इ. योजना राबविण्यात येऊन १२५५२२ कृषीपंपाचे ऊर्जीकरण करण्यात आले. उर्वरित प्रलंबित कृषीपंपाच्या वीज जोडण्या विविध योजनांतर्गत देण्यात येत आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रात नव्याने समाविष्ट झालेल्या २७ गावांतील अनधिकृत बांधकामाबाबत

**(१९) २८१५८ (१३-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रात नव्याने समाविष्ट झालेल्या २७ गावांमध्ये गाडगीळ पॅटर्नप्रमाणे ग्रामपंचायत काळात मोठया प्रमाणात अनधिकृत बांधकामे उभारली असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ग्रामपंचायतीला बांधकाम परवानगी देण्याचा अधिकार नसताना ग्रामपंचायतीने दिलेल्या बांधकाम परवानग्या देखील बेकायदेशीर आणि बोगस आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार बेकायदेशीर व बोगस बांधकामासंदर्भात शासनस्तरावर कोणता निर्णय घेण्यात आला वा येत आहे,

(४) तसेच, यास जबाबदार असणा-या व्यक्तींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१३-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रात नव्याने समाविष्ट केलेल्या

२७ गावांचे ग्रामपंचायती कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या अभिलेखात गाडगीळ पॅटर्नबाबत कोणताही उल्लेख करण्यात आलेला नाही. तसेच सदर बाब निदर्शनास आलेली नाही.

(२) हे खरे नाही.

ग्रामपंचायतीला बांधकाम परवानगी देण्याचे अधिकार नाहीत, ही बाब खरी आहे.

(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक येथे मेट्रो रेल्वे किंवा बीआरटीएस प्रणाली योजना अंमलात आणणेबाबत

**(२०) २८३८५ (१३-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक महानगरातील वाहनांची वाढती संख्या व सततची वाहतुक कोंडी यामुळे जनतेची होत असलेली प्रचंड गैरसोय, वेळ व इंधनाचा होणारा अपव्यय इत्यादी बाबी विचारात घेता आय.टी.डी.पी. संस्थेने केलेल्या सर्वेक्षणानुसार नाशिकमध्ये बी.आर.टी.एस. प्रणाली हा पर्याय सुचविला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक महानगरातील वाहतुक कोंडीची समस्या दुर होण्याचे दृष्टीने आणि शहराचा वाढता विस्तार विचारात घेऊन सक्षम वाहतूक व्यवस्था उभी करण्याच्या उपायांतर्गत अर्बन मास ट्रांन्सीट कंपनी लि. नवी दिल्ली यांचेमार्फत सर्वंकष वाहतूक आराखडा तयार करण्याची सुरु असलेली प्रक्रिया पुर्ण झाली आहे काय,

(३) असल्यास, सदर संस्थेमार्फत सर्वंकष वाहतुक आराखडा तयार होऊन तो शासनास प्राप्त झाला आहे काय, तद्नुसार वाहतूक व्यवस्थेसाठी सुचविण्यात आलेल्या उपायांचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,

(४) असल्यास, नाशिक महानगरपालिका क्षेत्राची सुधारित विकास योजना तयार करण्याची प्रगती पथावर असलेली कार्यवाही पूर्ण झाली आहे काय,

(५) असल्यास, वाहतूक व्यवस्थेबाबतचा बी.आर.टी.एस. प्रणालीबाबत कोणती

कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, नाशिक महानगरातील वाहतुक सुविधेसाठी बी.आर.टी.एस./मेट्रो रेल्वे प्रणालीबाबतची कार्यवाही केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१५-११-२०१७) :** (१) नाही.
(२), (३), (४), (५) व (६) नाशिक महानगरपालिकेने शहराचा सुधारीत सर्वंकष वाहतूक आराखडा तयार करण्याचे काम मेसर्स अर्बन मास ट्रान्झीट कंपनी लिमिटेड (UMTC), नवी दिल्ली या तज्ञ सल्लागार संस्थेस देण्यात आले असून सदर सल्लागाराने प्रारुप अहवाल सादर केला असून अंतिम अहवाल माहे नोव्हेंबर अखेर प्राप्त झाल्यानंतर नाशिक महानगरपालिकेमार्फत उचित कार्यवाही करण्याचे नियोजित आहे.

---

## मुंबई पश्चिम उपनगरातील वाहतूक कोंडीवर उपाययोजना करण्यासाठी आराखडा तयार करण्याबाबत

**(२१) २९१२२ (१३-०४-२०१७). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई पश्चिम उपनगरातील वांद्रे-खार लिंकिंग रोडवर होणा-या वाहतूक कोंडीवर उपाययोजना करण्यासाठी महानगरपालिकेने आराखडा तयार केला असल्याचे दिनांक ११ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू आराखडयांतर्गत लिंकिंग रोडवर सब-वे बनविला जाणार आहे तसेच रस्ता रुंदीकरण करण्यात येणार आहे तसेच इतरही उपाययोजना करण्यात येणार असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१) वांद्रे-खार लिंक रोडसाठी महानगरपालिकेमार्फत कोणताही आराखडा तयार करण्यात आलेला नसून,

सदर रस्त्यास २७.४५ मी. रुंदीची नियमित रेषा मंजूर करण्यात आलेली आहे.
(२) व (३) सदर रस्ता हा पूर्ण रुंदीमध्ये बहुतांश ठिकाणी विकसित झालेला असून, ज्या ठिकाणी रस्ता पूर्ण रुंदीचा नाही त्या ठिकाणी पूर्ण रुंदीचा रस्ता करण्याचे प्रस्ताविण्यात आले आहे.

सदर रस्त्याचे रुंदीकरण तसेच रस्त्यालगतच्या पट्टया खराब झाल्यामुळे, वांद्रे टर्नर रोड जंक्शनपासून ओशिवरापर्यंत १४ कि.मी. लांबीच्या दोन्ही बाजूच्या रस्त्यालगतच्या पट्टयांची दुरुस्ती करण्याचे काम महानगरपालिकेमार्फत हाती घेण्यात आले असून, आतापर्यंत ५०% लांबीच्या रस्त्यालगतच्या पट्टयांच्या दुरुस्तीचे काम पूर्ण करण्यात आले आहे.

---

## अकोला तालुक्यात महाराष्ट्र रोजगार हमी योजनेतून गावातील रस्त्यांची कामे पूर्ण करण्याबाबत

**(२२) २९२५५ (१५-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला तालुक्यात महाराष्ट्र महात्मा गांधी ग्रामिण रोजगार हमी योजनेतून जलसंधारणाच्या कामाशिवाय अन्य कामांना अघोषित फाटा दिल्याने ग्रामिण भागासाठी महत्वाच्या कामांकडे रोहयो विभागासह पंचायत समित्यांनी दुर्लक्ष केल्याचे माहे फेब्रुवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनेक गावातील शेत, रस्ते तसेच गावातील अंतर्गत रस्त्यांची कामे गेल्या दोन वर्षापासून झालेली नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, रोहयो योजनेच्या कामांचा आराखडा तयार करतांना ६०:४० असे कामांचे प्रमाण निश्चित करण्यात आले असतानाही कामे झालेली नाहीत, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (०२-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

अकोला तालुक्यात मग्रारोहयो अंतर्गत जलसंधारणाच्या कामाशिवाय १६३ सिंचन विहिरी, २२ गुरांचे गोठे, १५७ घरकुल, ३९ वृक्षलागवड, १४ शेतरस्ते, १९ शौचालय व १ सिंमेट बंधारा अशी एकूण ४१५ कामे माहे १ जानेवारी, २०१७ ते ३१ मार्च, २०१७ या कालावधीत घेण्यात आली आहेत.

(२) हे खरे नाही.

सन २०१५-१६ मध्ये शेतरस्ते १३ व अंतर्गत रस्ते ९, तसेच सन २०१६-१७ मध्ये शेतरस्ते ४९ व अंतर्गत रस्ते २१ अशी एकूण ९२ अपूर्ण कामे होती, ती अनुक्रमे दोन वर्षात पूर्ण करण्यात आलेली आहेत.

सन २०१५-१६ व २०१६-१७ मध्ये मजुरांच्या काम मागणीनुसार तालुक्यातील इतर ग्रामपंचायतीमध्ये मंजूर आराखडयानुसार ३५ शेतरस्ते व ३१ अंतर्गत रस्ते अशी एकूण ६६ नवीन कामे सुरु करण्यात आली आहेत.

(३) हे खरे नाही.

रोहयो अंतर्गत अपूर्ण असलेली व नवीन शेतरस्ता व अंतर्गत रस्त्यांची कामे कृती आराखड्यामध्ये नमूद असलेल्या ६०:४० प्रमाणाला निश्चित करुन मंजूर करण्यात आलेली आहेत.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळमनुरी (जि.हिंगोली) तालुक्यात जलयुक्त शिवार योजनेंतर्गत निधी अखर्चित राहिल्याबाबत

**(२३) २९९३७ (१५-०४-२०१७). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळमनूरी (जि.हिंगोली) तालुक्यात जलयुक्त शिवार योजनेंतर्गत कोटयवधी रुपयांचा आराखडा तयार करुन १६ गावांमध्ये कामे सुरु न झाल्याने रुपये एक ते सव्वा कोटी अखर्चित राहिल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०१-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

कळमनुरी तालुक्यात जलयुक्त शिवार अभियान सन २०१६-१७ मध्ये दि.२२/९/२०१७ अखेर जिल्हास्तरीय समितीने मान्यता दिलेल्या ५६२ कामांपैकी ३०३ कामे पूर्ण करण्यात आली असून १६६ कामे प्रगतीपथावर आहेत. प्रस्तुत कामांवर आतापर्यंत रू.५११.२६ लक्ष निधी खर्च करण्यात आला आहे.

(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मारेगाव (जि.यवतमाळ) शहरात चो-यांचे प्रमाण वाढल्याबाबत**

**(२४) ३०६५५ (१३-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मारेगाव (जि.यवतमाळ) शहरात भुरटया चो-यांचे प्रमाण वाढले असल्याने नागरिकांमध्ये प्रचंड दहशत निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या घटनांमुळे शहरातील जनतेच्या सुरक्षिततेचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत पोलिसांनी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

मारेगांव शहरात चोऱ्यांचे प्रमाण वाढले नसून सन २०१५ ते सन २०१७ या कालावधीतील चोऱ्यांचे खालील प्रमाणे गुन्हे नोंद आहे.

| अ.क्र. | वर्ष | एकूण नोंद गुन्हे | त्यापैकी उघड | उघडकीसचे प्रमाण | अटक आरोपी संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २०१५ | ५ | २ | ४० | २ |
| २ | २०१६ | २ | -- | -- | -- |
| ३ | २०१७ | २ | २ | १०० | ३ |

मारेगांव शहरात चालु वर्ष २०१७ मध्ये आतापर्यंत चोरीचे २ गुन्हे दाखल असून दोन्ही गुन्हे उघडकीस आले आहेत. यात ३ आरोपींना अटक करुन मुद्देमाल हस्तगत केला आहे. मारेगांव पोलिसांनी चोरीच्या गुन्ह्यांना आळा घातल्यामुळे नागरिकांमध्ये कोणत्याही प्रकारच्या दहशतीचे वातावरण नसून शांतता आहे.

(२) व (३) हे खरे नाही.

मारेगांव शहरात सन २०१७ मध्ये घडलेल्या चोरीच्या गुन्हयातील आरोपींविरुध्द कायदेशीर कारवाई करण्यात आल्याने तसेच शहरात सतत पेट्रोलींग व रात्रगस्त प्रभावीपणे राबविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई मालाड (पश्चिम) महापालिकेच्या परिसरातील अनेक हॉटेल्समधील अग्निसुरक्षेबाबत

**(२५) ३०९३९ (११-०८-२०१७). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.सुनिल तटकरे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई, मालाड (पश्चिम) महापालिकेच्या पी. उत्तर परिसरातील स्काय शॉट्स, काचपाड्याला क्यूबा टेरेस, सिल्वहर ओक्स, मिठचौकीला टिंबक्टू लॉज, कॅफे ओ १५, पॉप टेट्स, एव्हरशाईन नगरला स्लाईस ऑफ लाईम, फीव्हर इत्यादी हॉटेलच्या अग्निसुरक्षेबाबत अनेक त्रुटी आढळल्या असून तक्रारींच्या अनुषंगाने अग्निशमन अधिकाऱ्यांनी तपासणीत अग्निसुरक्षेसंदर्भात अग्निरोधक यंत्रणा, ना हरकत प्रमाणपत्र व इतर कागदपत्रे या हॉटेल्सकडून सादर केली नसल्याची अग्निशमन विभागाकडून सादर अहवालात माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पी. उत्तरच्या आरोग्य विभागाकडे सदर अहवाल पाठवूनही विभागाकडून पुरेसे मनुष्यबळ नसल्याचे कारण देवून कारवाईस विलंब होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, हॉटेलमध्ये येणाऱ्या नागरिकांचा सुरक्षेच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१७-११-२०१७) :** (१) मालाड (पश्चिम) येथील क्युबा टेरेस, सिल्व्हर ओक्स, स्लाईस ऑफ लाईम व फिव्हर या हॉटेल्सना बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या अग्निशमन विभागामार्फत ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात आलेले नाही.

तथापि, स्काय शॉट्स, टिंबक्टू लॉज, कॅफे ओ १५ व पॉप टेटस या हॉटेल्सना अग्निशमन विभागामार्फत ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात आले आहे.

(२) हे खरे नाही.

(३) बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत ८ हॉटेल्सना मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ च्या कलम ३९४ अंतर्गत निरीक्षण अहवाल देण्यात आला असून, ०६ हॉटेल्सविरुध्द न्यायालयीन खटले दाखल करण्यात आले आहेत.

सदर प्रकरणे न्यायप्रविष्ठ असून, सदर जागा महानगरपालिकेमार्फत निरीक्षणाखाली ठेवण्यात आल्या आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील वाहतूक पोलिसांच्या गैरव्यवहाराबाबत

**(२६) ३११०० (११-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ : तारांकित प्रश्न क्रमांक २६७६० ला दिनांक १५ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील वाहतूक विभागातील पोलीस मोठया प्रमाणात गैरव्यवहार करीत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त होत असलेला गैरव्यवहार रोखण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१७-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

मात्र, मुंबई वाहतूक पोलीस विभागात पुर्वी कार्यरत असलेले पोलीस हवालदार क्रमांक २४००४ श्री.सुनिल टोके यांनी मा.उच्च न्यायालयात क्रिमिनल रिट पिटिशन याचिका क्रमांक ४६०६/२०१६ दाखल केलेली होती.

सदर याचिकेचे मा.न्यायालयाने क्रिमिनल जनहित याचिकेमध्ये रुपांतरण करुन नविन जनहित याचिका क्रमांक २०/२०१७ दाखल केली आहे. याबाबतची अंतिम सुनावणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित आहे.

(२) मुंबई वाहतूक विभागातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांविरुध्द गैरव्यवहाराच्या प्राप्त तक्रारींची चौकशी करण्यासाठी वाहतूक मुख्यालयात माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये विशेष कक्ष स्थापन करण्यात आला आहे.

नागरीकांना तक्रार करणे सुलभ व्हावे याकरीता complaint.mumtraffic@mahapolice.gov.in हा ई-मेल आयडी निर्माण केला आहे व चौकशीअंती कसूरदार कर्मचाऱ्यांवर कारवाई केली जाते.

तसेच खालीलप्रमाणे उपाययोजना अंमलात आणल्या आहेत :-

**सीसीटीव्ही चलन :** शहरातील महत्वाच्या जंक्शनवरील एकूण ५,४०८ कॅमेऱ्यांच्या मदतीने वाहतूक नियमांचे उल्लंघन करणाऱ्या वाहनचालकांवर प्रभावीपणे कारवाई करण्यात येते. दंडाची रक्कम डिजिटल पेमेंटद्वारे स्विकारण्याची सुविधा करण्यात आल्याने पारदर्शकता आली आहे.

**ई-चलन उपकरणे :** माहे ऑक्टोबर, २०१६ पासून वाहतूकीचे नियमन करणाऱ्या अंमलदारांना ९०० ई-चलन उपकरणे वितरीत करण्यांत आलेली आहेत. तडजोड शुल्क रक्कम भरतांना वाहतूक पोलिसांचा रोख रकमेच्या देवाणघेवाणीशी संबंध येत नसल्याने दंडवसूलीच्या कामात पारदर्शकता आली आहे.

**हेल्पलाईन :** वाहतूकीच्या संदर्भातील तक्रारींच्या निवारणासाठी विशेष मदत दूरध्वनी क्रमांक ८४५४ ९९९ ९९९ हा उपलब्ध करुन देण्यांत आलेला आहे.

**ब्रेथ ॲनालायजर मशिन :** मद्यपी वाहनचालकांवर अंकुश ठेवण्यासाठी व अपघाताला प्रतिबंध करण्यासाठी “ड्रंक अँड ड्राईव्ह” मोहिमेकरीता एकूण १७२ अत्याधुनिक ॲनालायजर मशिन वापरात आहेत. सदर मशिनमध्ये GPS सुविधा व छायाचित्र घेण्याची सुविधा असून या मशिन मुख्यालयातील सर्व्हरला जोडलेल्या आहेत. त्यामुळे वाहतूक पोलिसांच्या कामात पारदर्शकता आलेली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रायगड वेतन पथक कार्यालयामध्ये सहायक लेखाधिकारी पद रिक्त असल्याबाबत

**(२७) ३११८८ (११-०८-२०१७). अॅड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रायगड वेतन पथक कार्यालयामध्ये सहायक लेखाधिकारी पद मागील ८ ते ९ महिन्यापासून रिक्त असल्याचे दिनांक १ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) तसेच रायगड जिल्ह्यातील शिक्षकांची संख्या पाहता तेथे ६ लेखाधिकारी असणे गरजेचे असूनही पद रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, वेतन पथक कार्यालयामध्ये लेखाधिकारी उपलब्ध व्हावा, यासाठी लोकप्रतिनिधीमार्फत संचालनालय, लेखा व कोषागार येथे निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, निवेदनाच्या अनुषंगाने शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (२५-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.

शिक्षणाधिकारी (प्राथमिक) वेतन व भनिनि पथक, रायगड या कार्यालयात महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील सहाय्यक लेखा अधिकारी १ पद मंजुर आहे. सदरच्या दि. १३/१२/२०१४ पासून रिक्त असलेल्या पदावर संचालनालयाच्या दि. १०/०८/२०१७ रोजीच्या आदेशान्वये सहाय्यक लेखा अधिकरी ची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

अधिक्षक, वेतन भविष्य निर्वाह निधी पथक (माध्यमिक), रायगड या कार्यालयात महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील सहाय्यक लेखा अधिकारी १ पद मंजुर आहे. सदरच्या दि. ३१/०५/२०१६ पासुन रिक्त असलेल्या पदावर संचालनालयाच्या दि. १०/०८/२०१७ रोजीच्या आदेशान्वये सहाय्यक लेखा अधिकारी ची नियुक्ती करण्यात आलेली आहे. त्यामुळे सद्य:स्थितीत सदर पदे रिक्त नाहीत

(२) हे खरे नाही.

रायगड जिल्ह्यामधील जिल्हापरिषदेमधील शिक्षकांच्या वेतन पडताळणीकरीता महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील लेखा अधिकारी हे पद मंजुर असून अनुदानित शाळांमधील शिक्षकांकरीता १ अशी दोन पदे मंजुर आहेत. सद्य:स्थितीत सदर दोन्ही पदांवर लेखाधिकारी संवर्गातील अधिकारी कार्यरत आहेत.

महाराष्ट्रामधील सर्व जिल्ह्यांमध्ये शिक्षकांच्या वेतन पडताळणीकरीता वरिलप्रमाणेच पदे मंजुर आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेकडून पर्जन्यवृक्षांकडे दुर्लक्ष होत असल्याबाबत

**(२८) ३१२६८ (११-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईमध्ये अगोदरच अतिशय कमी असलेल्या वृक्षांकडे महानगरपालिकेने दुर्लक्ष केल्याने पर्जन्यवृक्षावर मोठया प्रमाणात मिलीबगचा प्रादुर्भाव झाला असून तसेच वृक्षांच्या मुळाजवळ कॉंक्रिटीकरण झाल्याने बहुगुणी करंजाची झाडे नामशेष होत असल्याचे दिनांक २९ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) सन २०१० मध्ये मुंबई शहरातील पर्जन्यवृक्षांवर मिलिबग किडीचा मोठया प्रमाणात प्रादुर्भाव होऊन झाडे सुकत चालल्याचे आढळल्याने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात आली/ येत आहे :-

• जैविक, रासायनिक आणि यांत्रिकी पध्दतीचा वापर करुन किटकांचा नायनाट करण्यात आला.

• सदर झाडांची सखोल शास्त्रीय पाहणी करुन, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठाने दिलेल्या अहवालानुसार व तज्ञांच्या मार्गदर्शनानुसार किडग्रस्त वृक्षांवर उपाययोजना करण्यात आल्या.

• प्रत्येक परिमंडळातील कनिष्ठ वृक्ष अधिकाऱ्यांना पर्जन्यवृक्ष निरीक्षणाखाली ठेवण्याच्या सूचना देण्यात आल्या.

• पर्जन्यवृक्षांच्या भोवतालचे कॉंक्रिट काढून टाकण्याची कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला येथे मुख्य अधिसेविकाने इतरांचे मानसिक छळ केल्याबाबत**

**(२९) ३१२८१ (१९-०८-२०१७). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला येथे मुख्य अधिसेविकेच्या रिक्त असलेल्या पदावर माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान श्रीमती ग्रेसी मारीआन रुजू झाल्या, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुख्य अधिसेविका यांनी रुजू झाल्यापासून सहाय्यक अधिसेविका व इतर अधिसेविकेचा वैयक्तिक कारणाने मानसिक छळ केला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याप्रकरणी एका अधिसेविकेने मुख्य अधिसेविका अन्याय करीत असल्याबाबतची तक्रार अधिष्ठाता यांचेकडे केली असता सदर प्रकरणाबाबत चौकशी समिती गठीत करण्यात आली होती, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन समितीच्या अहवालाच्या अनुषंगाने संबंधित दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०६-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२), (३), (४) व (५) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय अकोला येथील रिक्त पदावर नियुक्त झालेल्या अधिसेविकेने एका सहायक अधिसेविकेचा मानसिक छळ केल्याची तक्रार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय अकोला येथे प्राप्त झालेली आहे. त्यानुषंगाने डॉ.अनिल बात्रा, प्रा. व वि. न्यायवैद्यकशास्त्र विभाग यांचे अध्यक्षतेखाली एक सदस्यीय चौकशी समिती गठीत करण्यात आली असून अंतिम अहवाल अद्याप अप्राप्त आहे.

---

**नागपूर येथील मिहान सेझ प्रकल्पात कंपन्यांनी कामे सुरू न केल्याबाबत**

**(३०) ३१३६१ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.मितेश भांगडिया, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.नरेंद्र पाटील : दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक १९३५० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मिहानच्या मूळ प्रकल्प अहवालातील प्रस्तावामध्ये ५० टक्के कपात करण्यात आल्याची बाब निदर्शनास आली असून हा प्रकल्प पूर्ण करण्याची कालमर्यादा सन २०३० वरून सन २०४५ करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त निर्णयास मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मिहान सेझ प्रकल्पात ६६ कंपन्यांना जागा उपलब्ध करून देण्यात येऊन त्यापैकी १५ टक्के कंपन्यांनी काम सुरू केले असून ५४ टक्के कंपन्यांचे काम सुरू झाले नसल्याचे दिनांक २० एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर कंपन्यांना जागा उपलब्ध करून देण्यात येऊनही अद्याप कामे सुरू न करणा-या कंपन्यांवर शासन कोणती कार्यवाही करणार आहे,

(५) तसेच, मूळ प्रकल्प अहवालानुसार मिहान प्रकल्प साकारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (३०-१०-२०१७)** : (१) मिहान प्रकल्पाच्या निर्धारित क्षेत्रात कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

सन २०००-२००१ मध्ये एल ॲण्ड टी रॅम्बॉल यांनी तयार केलेला अहवाल त्यावेळेच्या विमान वाहतुकीबाबत असलेल्या परिस्थितीनुरुप तयार केला होता. त्यानंतर हवाई प्रवासी वाहतूक क्षेत्रात झालेले बदल विचारात घेऊन भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांच्या मार्गदर्शनाखाली हवाई वाहतूक प्रक्षेपणाबाबत पुनर्रचना करण्यात आली. त्यानुसार विमानतळावरुन हाताळण्यात येणाऱ्या प्रवासी संख्येच्या प्रमाणात अंदाजे ५० टक्के घट करण्यात आली आहे. तसेच, हा प्रकल्प पूर्ण करण्याची कालमर्यादा सन २०३० वरुन सन २०४५ करण्यात आली आहे.
(२) सद्य:स्थितीत आवश्यकता नाही.
(३) मिहान सेझ प्रकल्पात ७१ कंपन्यांना जागा देण्यात आली असून त्यापैकी २१ म्हणजेच साधारणत: ३०% कंपन्या कार्यरत आहेत. तर, ५ कंपन्यांमध्ये (म्हणजे साधारणत: ७%) बांधकाम सुरु आहे. उरलेल्या ४५ (म्हणजे साधारणत: ६३%) कंपन्यांमध्ये काम सुरु करण्यासाठी पाठपुरावा सुरु आहे.
(४) जानेवारी, २०१६ मध्ये ज्या उद्योगांनी काम सुरु केले नव्हते, अशा सर्व उद्योगांना नोटीस पाठविण्यात आली होती. त्यातील काही उद्योगांनी उद्योग सुरु करण्याची तयारी दर्शविली व ते करण्यासाठी मुदतवाढ मागितली. त्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कं. च्या संचालक मंडळाने ऑक्टोबर, २०१६ मध्ये मंजूर केलेल्या तरतुदीनुसार सेझमधील इच्छुक भूखंड धारकांना ठराविक बांधकाम विहीत मुदतीत पुर्ण करण्याच्या अटीवर एप्रिल, २०१६ पासून पुढे ४ वर्षांची मुदतवाढ देण्यात आली आहे.
(५) मिहान प्रकल्प साकारण्यासाठी विशेष स्तरावर प्रयत्न सुरु आहेत.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात वैद्यकीय प्रवेशासासाठी नीटच्या प्रवेश प्रक्रियेत पारदर्शकता नसल्याबाबत

**(३१) ३१९९४ (१८-०८-२०१७). ॲड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वैद्यकिय प्रवेशासाठी नीटच्या प्रवेश प्रक्रियेत पारदर्शकता नसल्याने राज्यातील बहुतांश महाविद्यालयांनी प्रवेश प्रक्रियेत गैरव्यवहार केल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नूसार वैद्यकिय प्रवेश प्रक्रिया पारदर्शक व्हावी म्हणून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०२-११-२०१७) :** (१) नाही, हे खरे नाही. राज्यातील वैद्यकीय अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रिया ही ‘नीट’ या सामाईक प्रवेश परीक्षेच्या गुणवत्तेनुसार एकत्रित समुपदेशनाद्वारे आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष यांचेमार्फत पारदर्शकपणे राबविण्यात येते.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(३२) ३२०५३ (१९-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : दिनांक ६ एप्रिल, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक २५७६३ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापकांची रिक्त पदे भरण्याची सुरु असलेली कार्यवाही पुर्ण करुन सदर रिक्त पदे भरण्यात

आली आहेत काय,
(२) असल्यास, जागतिक आरोग्य संस्थेच्या मानकानुसार (डब्ल्यु.एच.ओ.) लोकसंख्येच्या तुलनेत १:१००० याप्रमाणे वैद्यकीय अधिकारी उद्दिष्ट / ध्येय साधनेसंबंधीच्या विचाराधीन बाबीवरील कार्यवाही करण्यात आली आहे काय,
(३) नसल्यास, विचाराधीन प्रस्तावावरील निर्णय व कार्यवाही केव्हापर्यंत पूर्ण होणे अपेक्षित आहे ?

**श्री. गिरीष महाजन (०१-११-२०१७)** : (१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापकीय पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळून निवड मंडळामार्फत भरण्याकरिता मान्यता दिलेली आहे. तदनुसार प्राध्यापक संवर्गाची ३१ पदे, सहयोगी प्राध्यापक संवर्गातील ३५ पदे व सहाय्यक प्राध्यापक या संवर्गातील १२२ पदे अशी एकूण १८८ पदे भरण्याकरिता निवड मंडळामार्फत जाहिरात प्रसिद्ध करण्यात आली आहे. त्यामुळे शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापकांची रिक्त पदे भरण्याची कार्यवाही सुरू आहे.
(२) जागतिक आरोग्य संघटनेच्या मानांकनानुसार राज्यामध्ये १:१३०० या प्रमाणात लोकसंख्येच्या तुलनेत वैद्यकीय (MBBS) डॉक्टर उपलब्ध आहेत. त्यामध्ये आयुर्वेद, होमिओपॅथी डॉक्टरांची संख्या विचारात घेता जागतिक आरोग्य संघटनेच्या मानांकापेक्षा जास्त डॉक्टर राज्यात उपलब्ध आहेत.
(३) रिक्त अध्यापकांची पदे ६ महिन्यात भरणे अपेक्षित आहे.

---

## मुंबईतील महिलांच्या सुरक्षेबाबत

**(३३) ३२६०४ (११-०८-२०१७). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईत दिनांक १ एप्रिल, २०१६ ते ३० मार्च, २०१७ याकालावधीत सामूहिक अत्याचाराचे सुमारे ११ गुन्हे दाखल झाले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मुंबईत महिलांच्या सुरक्षेचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१०-१०-२०१७)** : (१) होय, हे खरे आहे.

११ गुन्हे उघडकीस आले आहेत.

(२) हे, खरे नाही.

(३) बाल लैंगिक शोषणावर बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयामार्फत करण्यात आलेल्या उपाययोजना पुढीलप्रमाणे आहे.

* पोलीस दीदी योजनेमार्फत शाळा व परिसरातील मुलांना अनोळखी व्यक्तीबाबत दक्षता घेण्याचे मार्गदर्शन करतात.

शाळेमध्ये विद्यार्थ्यांना बॅड टच व गुड टच बाबत मार्गदर्शन केले जाते.

* मोहल्ला कमिटीतील पोलीस मित्र सभासद यांचे बैठका घेऊन मुलांना बाहेर सोडू नये, अनोळखी, संशयीत वाटल्यास पोलिसांना खबर देणे अश्या सूचना देण्यात येतात.

* पोलीस ठाणे हद्दीत बिनतारी संदेश वाहन बीट अधिकारी यांचेमार्फत गस्त घालण्यात येते.

* महिला कक्षाची स्थापना केली आहे.

* महिला दक्षता कमिटी स्थापन करण्यात आली आहे.

* महिला छेडछाड विरोधी पथके तयार करण्यात आली आहे.

* ९४ महिला व बाल सुरक्षा गस्त पथके तयार करण्यात आली आहे.

* १०२ महिला बीट मार्शल मोटार सायकल वाहनासह नेमण्यात आले आहे.

* विशेष हेल्पलाईन १००, १०३ व १०९० सूरू करण्यात आली आहेत.

* पोस्को कायदाप्रमाणे कठोर कारवाई करण्यात येते.

* निर्मनुष्य जागेच्या ठिकाणी सीसीटीव्ही कॅमेरे, प्रकाश व्यवस्था करण्याचे उपाययोजना राबविण्यात येते.

(४) प्रश्न उदभवत नाही.

## कल्याण शहरातील अनधिकृत बांधकामे निष्कासित करण्याबाबत

**(३४) ३२७१० (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब : तारांकित प्रश्न क्रमांक २४३१९ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण शहरातील शिवाजी चौक ते पोलीस उपायुक्त परिमंडळ-३ या रस्त्याच्या दुतर्फा ताब्यात घेतलेल्या जागेच्या मोबदल्यात वाढीव मजले बांधण्यास नगररचना विभागाने मंजूरी दिली नसल्याने सदरची बांधकामे निष्कासित करण्यात आली आहेत, हे खरे आहे काय,

(२) नसल्यास, सदर अनधिकृत बांधकाम निष्कासित करण्यास विलंब होण्याची कारणे काय आहेत,

(३) तसेच, याबाबत संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात आली आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०८-११-२०१७) :** (१) व (२) कल्याण शहरातील शिवाजी चौक ते पोलीस उपायुक्त परिमंडळ-३ या रस्त्याच्या विकास योजनेतील रुंदीनुसार बाधित होणाऱ्या बांधकामांना महानगरपालिकेच्या नगररचना विभागाने दिलेल्या सिमांकनानुसार बांधकामे निष्कासित करण्यात आलेली आहेत. उर्वरित जागेवर आहे त्याच स्थितीत दुरुस्ती करण्याकरीता संबंधित बाधित बांधकाम धारकांस महानगरपालिकेमार्फत अनुमती देण्यात आलेली आहे.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आशिया बँकेच्या मदतीने राज्यात कृत्रिम चौपाटया तयार करण्याबाबत

**(३५) ३२८५० (११-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर, श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात १० ठिकाणी आशिया बँकेच्या मदतीने कृत्रिम चौपाटया तयार करण्याचे शासनाने ठरविले असल्याचे माहे मार्च, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) राज्यात आशिया विकास बँकेच्या मदतीने कृत्रिम चौपाट्या तयार करण्यासाठी शास्वत किनारा संरक्षण आणि व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत कामांची अंमलबजावणी व व्यवस्थापकीय यंत्रणा म्हणून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड काम करीत आहे. प्रकल्पाच्या दुसऱ्या टप्प्यात ११ ठिकाणांची निवड करण्यात आली असून प्रकल्प सल्लागाराने पूर्व सर्व्हेक्षण करुन तांत्रिक व आर्थिक अहवाल सादर केला आहे. सदर कामासाठी आवश्यक निधीकरिता आशिया विकास बँकेकडून कर्ज घेणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन असून कर्ज उपलब्ध झाल्यास पुढील कार्यवाहीचा विचार करण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विदर्भातील दंडारी दलदल कुही (जि.गोंदिया) व वडाधाम जीवाश्म पार्क (जि.गडचिरोली) या दोन ठिकाणांना जैवविविधता वारसास्थळाचा निधी मिळण्याबाबत**

**(३६) ३२९२२ (१८-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विदर्भातील दंडारी दलदल कुही (जि.गोंदिया) व वडाधाम जीवाश्म पार्क (जि.गडचिरोली) या दोन ठिकाणांना जैवविविधता वारसास्थळाचा दर्जा शासनाने दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हा दर्जा दिल्यामुळे त्याठिकाणी कोणकोणती कामे हाती घेण्यात येणार आहे,

(३) यासाठी शासनाने किती निधी मंजूर केलेला आहे व त्यापैकी किती निधी खर्च करण्यात आला आहे ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (१८-११-२०१७) :** (१) होय.
(२) व (३) सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राज्य योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या योजनेंतर्गत शासन निर्णय दि. १८/५/२०१७ अन्वये वर्धम फॉसील पार्क ला रु. ८३.७५ लक्ष निधी मंजूर करण्यात आला आहे. सदर निधीतून जिवाश्म अवशेष शिक्षण केंद्र, फॉसील रिप्लिका, पाण्याची टाकी व पाईपलाईन, वॉटर स्टँड, रस्ता दुरुस्ती व कल्वर्ट, रिटेनिंग वाल, सोलर युक्त बोरवेल सिस्टिम, माहिती दर्शक सूचना फलक, प्रजाती नुसार रोपे लागवड, प्रसाधन गृह उभारणे, सोलर लाईट, अवशेष उद्यान साफसफाई, देखरेख चौकीदार, तिकीट घर दुरुस्ती, JFMC सीड मनी इ. कामे करण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## किसान सहकारी स्टार्च कारखाना (जि.धुळे) व जळगाव जिल्हा सहकारी मका उत्पादक संस्था (जि.जळगाव) या सहकारी संस्थांना विक्री करात सवलत देण्याबाबत

**(३७) ३२९५६ (१८-०८-२०१७). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सामुहिक प्रोत्साहन योजना सन १९९३ नुसार नवीन उद्योग उभारणीकरिता 'डी' आणि 'डी प्लस' झोनमध्ये गुंतवणूकीच्या १०० टक्के विक्री करामध्ये सवलत देण्यात येते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किसान सहकारी स्टार्च कारखाना (जि.धुळे) व जळगाव जिल्हा सहकारी मका उत्पादक संस्था (जि.जळगाव) या सहकारी तत्वावर मक्यावर प्रक्रिया करून स्टार्च बनविणाऱ्या प्रकल्पांना शासनाकडून भाग भांडवल व शासनाच्या थक हमीवर राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांचेकडून कर्ज उपलब्ध करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, रुपये ५०.०० कोटी गुंतवणूक असलेले उपरोक्त दोन्ही प्रकल्प विक्रीकरासाठी पात्र असताना व्यवस्थापनाच्या अडचणीमुळे बंद पडले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सामुहिक प्रोत्साहन योजना सन १९९३ च्या मुळ संकल्पनेनुसार गुंतवणूकीच्या प्रमाणात विक्री करामध्ये सवलत मिळणे आवश्यक असताना उपरोक्त दोन्ही प्रकल्पांची राज्य सहकारी बँकेने अत्यंत कमी किंमतीत विक्री करुन नवीन संस्थेच्या खरेदीची किंमत रुपये १५.०० कोटी इतकीच मर्यादित असल्यामुळे या किंमतीवर सवलत देण्याऐवजी मुळ प्रकल्पाच्या रुपये ५०.०० कोटी गुंतवणूकीवर सवलत दिलेली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, शासनाच्या या धोरणामुळे अन्य युनिटवर परिणाम होत असून शासनाचे महसूलीचे नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, याप्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री. सुभाष देसाई (२७-११-२०१७) :** (१) होय हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) होय, हे खरे आहे.

मे.किसान सहकारी स्टार्च कारखाना जि.धुळे हा घटक व्यवस्थापनाच्या अडचणीमुळे बंद पडला होता. घटक सन २००९ मध्ये एनपीए मध्ये गेल्याने बँकेमार्फत सन २०१० मध्ये मे.ट्रेडको डिसान प्रा.लि. यांना विक्री करण्यात आला आहे.

मे.जळगाव जिल्हा सहकारी स्टार्च उत्पादक सहकारी संस्था, जळगाव सततच्या तोटयामुळे हा कारखाना स्वत: संस्थेकडून पुनर्जिवीत करणे व चालवणे शक्य नसल्यामुळे तसेच बँक कर्ज व इतर देणी देणे शक्य नसल्याची खात्री झाल्यामुळे मार्च, २००३ पासून ही संस्था अवसायानात आल्यामुळे कर्ज पुरवठादार बँकेने संस्था ताब्यात घेऊन हा प्रकल्प मे.ऑनेस्ट डेरिव्हेटीव्ह प्रा.लि. यांना विक्री केलेला आहे.

(४) सामुहिक प्रोत्साहन योजना सन १९९३ अंतर्गत पात्र स्थिर भांडवली गुंतवणूकीवर प्रोत्साहने अनुज्ञेय होतात. एखादया पात्रता प्रमाणपत्र प्राप्त घटकाची मालकी हस्तांतरीत झाल्यास त्याचे पात्रता प्रमाणपत्र सुध्दा हस्तांतरीत करण्याची तरतुद आहे.

(५) हे खरे नाही.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

## शिर्डी येथील साई संस्थान यांनी निळवंडे धरणाच्या कालव्यांसाठी निधी दिल्याबाबत

**(३८) ३३०६२ (११-०८-२०१७). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिर्डी येथील साई संस्थान यांनी निळवंडे धरणाच्या कालव्यांसाठी रुपये ५०० कोटी शासनास दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हा निधी शासनाकडे प्राप्त झाला आहे काय, त्यानुषंगाने शिर्डी संस्थानाने शासनास कोणत्या अटी व शर्ती घातल्या आहेत,
(३) असल्यास, निळंवडे धरणाच्या कालव्याची कामे त्वरीत पूर्ण करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (१३-११-२०१७) :** (१) नाही.

श्री.साईबाबा संस्थान, शिर्डी, यांच्या व्यवस्थापन समितीच्या बैठकीमध्ये निळवंडे प्रकल्पाच्या कालव्यांच्या कामास श्री. साईबाबा संस्थान, शिर्डी यांचे कडून रु. ५०० कोटी निधी परतीच्या बोलीवर महाराष्ट्र शासनास उपलब्ध करुन देण्याबाबत चर्चा झाली व दि. २४/५/२०१७ रोजीच्या बैठकीत त्यास मान्यता देण्यात आली आहे.
(२) सदर निधी शासनास प्राप्त झालेला नाही. श्री. साईबाबा संस्थान, शिर्डी यांच्याकडून सदर निधी उपलब्ध करुन देण्यास खालील अटी प्रस्तावित आहेत.

निळवंडे धरणामध्ये पाणी आरक्षणाची व धरणाच्या भाग भांडवलाची रु. १८३.९३ कोटी मात्र रक्कम माफ करावी, अशी मागणी शासनाकडे करावी. तसेच रु. ५०० कोटी निधी कोणकोणत्या कामांवर व कशा पध्दतीने वापरणार आहे, याचा बृहद आराखडा समितीसमोर सादर करणेबाबत जलसंपदा विभागास कळविणेत यावे. परंतु कालव्यांचे आतापर्यंत झालेल्या कामाच्या खर्चासाठी किंवा देयके अदा करणेसाठी हा निधी वापरता येणार नाही व एक विशेष बाब म्हणून हा निधी फक्त कालव्यांचे यापुढील

कामासाठीच वापरण्यात यावा व या कालव्यांचे काम जस-जसे पूर्ण होईल, त्याप्रमाणात टप्प्या-टप्प्याने निधी वर्ग करणेत येईल.
(३) प्रकल्पाच्या रुपये २३६९.९५ कोटी इतक्या रकमेच्या चतुर्थ सुधारित प्रशासकीय अहवालास शासनाने दिनांक २१/६/२०१७ अन्वये मान्यता दिली आहे.

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात प्रकल्पास एकूण रुपये ४६.६० कोटी इतक्या निधीची तरतूद केली आहे.
(४) प्रश्न उदभवत नाही.

---

**राज्यात मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना सुरु करण्याबाबत**

**(३९) ३३१३४ (१९-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात शेतकऱ्यांना माफक दरात व त्यांच्या सोयीनुसार वीज पुरवठा उपलब्ध होण्यासाठी मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना राबविण्यास दिनांक ३० मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यामुळे पारंपारिक वीजेची मोठी बचत होऊन तिचा वापर इतर कामांसाठी करणे शक्य होणार असल्याने पीपीपी तत्वावर सुरु करण्यात येणाऱ्या या योजनेचे स्वरुप काय आहे व त्याची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उक्त योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी वार्षिक किती निधीची आवश्यकता आहे, सदर निधी कशाप्रकारे उपलब्ध करण्यात येणार आहे व प्रत्यक्षात किती निधी उपलब्ध करण्यात आला आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (२१-११-२०१७) :** (१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या ऊर्जा शाखेव्दारे दि. १४ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार राज्यातील ज्या ग्रामीण भागामध्ये गावठाण व कृषी वाहिनीचे विलगीकरण

झाले आहे अशा ठिकाणी कृषी वाहिनीचे सौर ऊर्जेव्दारे विद्‌युतीकरण करण्याच्या उद्देशाने "मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजना" सुरू करण्यात आली आहे.

(२) मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेची ठळक वैशिष्टे खालीलप्रमाणे आहेत:-

१) राज्यातील ज्या ग्रामीण भागामध्ये गावठाण व कृषी वाहिनीचे विलगीकरण झाले आहे अशा ठिकाणी कृषी वाहिनीचे सौर ऊर्जेव्दारे विद्‌युतीकरणाची योजना आहे.

२) याचा फायदा कृषी ग्राहकांना शेतीसाठी व पाणीपुरवठा करणाऱ्या लिफ्ट इरिगेशन योजनांना वीज पुरवठा करण्यासाठी होणार आहे.

३) या योजनेची अंमलबजावणी महानिर्मिती या कंपनीव्दारे महाऊर्जा व महावितरण कंपनीच्या सहाय्याने करण्यात येईल. सदर योजना खाजगी-लोक सहभाग तत्वावर राबविण्यात येईल.

४) पारदर्शक व स्पर्धात्मक निविदा प्रक्रिया राबवून खाजगी गुंतवणूकदार निवडून त्यांच्यासमवेत सौर कृषी वाहिनी प्रकल्प उभारण्याकरिता विशिष्ट कालावधीकरिता करार करण्यात येईल.

५) प्रकल्पाची उभारणी व देखभाल दुरूस्ती खाजगी गुंतवणूकदाराकडून होईल.

६) यामुळे पारंपरिक वीजेची बचत होऊन अशा विजेचा वापर इतर उत्पादनक्षम कामासाठी होईल. तसेचमहावितरण कंपनीचा विजेच्या खरेदीवरील खर्च कमी होईल.

या योजनेंतर्गत मांजरडा (कोळंबी), ता. जि. यवतमाळ व राळेगणसिध्दी, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे प्रत्येकी २ मे.वॅ. क्षमतेचे पथदर्शी प्रकल्प करण्यात येत असून याशिवाय महानिर्मितीव्दारे विदर्भ, मराठवाडा,पश्चिम व उत्तर महाराष्ट्र क्षेत्रात प्रत्येकी ५० मे.वॅ. क्षमतेचे प्रकल्प उभारण्याकरिता निविदा प्रक्रिया सुरू करण्यात आली आहे.

(३) महानिर्मिती कंपनीतर्फे उक्त योजनेंतर्गत राज्यात २०० मे.वॅ. क्षमतेचे सौर ऊर्जा कृषी वाहिनी प्रकल्प उभारण्याकरितालागणाऱ्या मूलभूत सुविधांसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रू. २०० कोटी इतक्या निधीची आवश्यकता आहे. सदर निधी हरित ऊर्जा निधीमधून तसेच केंद्र शासनाकडून प्राप्त

होणाऱ्या संभावित व्यवहार्यता अंतर निधी (VGF) व्दारे उपलब्ध करण्यात येणार आहे. सदर योजनेत आवश्यकतेनुसार विजेच्या निष्कासनासाठी होणारा खर्च महाऊर्जा मार्फत उपलब्ध करून देण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यातील प्रयोगशाळा सहाय्यक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या समस्यांबाबत**

**(४०) ३३१४१ (१९-०८-२०१७). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्रयोगशाळा सहाय्यक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या समस्यांबाबतचे निवेदन लोकप्रतिनिधींनी मा.वैद्यकीय शिक्षण मंत्र्यांना माहे मे, २०१७ च्या तिसऱ्या आठवडयात दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनाच्या अनुषंगाने शासनाने चौकशी करुन प्रयोगशाळा सहाय्यक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या समस्या दूर करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (३०-१०-२०१७) :** (१) हे खरे आहे.
(२) प्रयोगशाळा सहाय्यक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या बहुतांशी मागण्या हया धोरणात्मक बाबींशी संबंधित असल्याने सदर मागण्या शासनाच्या विचाराधीन आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**चांदपूर तलावात (ता.तुमसर, जि.भंडारा) गाळ जमा झाल्यामुळे पिचिंग उखडल्याबाबत**

**(४१) ३३२९९ (१०-०८-२०१७). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चांदपूर तलावात (ता.तुमसर, जि.भंडारा) गाळ जमा झाल्यामुळे तलाव पूर्णपणे भरुन पिचींग उखडल्याने दगड उघडे पडल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, स्थानिक कोळी बांधव याच तलावातून पारंपारिक पध्दतीने मासेमारी करीत आहेत परंतु पिचींग उखडल्यामुळे जिवीतहानी होण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत स्थानिक नागरीकांनी जिल्हाधिकारी यांचेकडे वेळोवेळी निवेदने दिलेली असून याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०७-११-२०१७) :** (१) व (२) नाही.

चांदपूर मध्यम प्रकल्पाच्या जलाशयातून मासेमारी करीता प्रचलीत नियमानुसार मत्स्यविभागामार्फत मागासवर्गीय बहुउद्देशीय मत्स्यपालन सहकारी संस्था लिमीटेड चांदपूर या स्थानिक संस्थेला वर्ष २०१३-१४ ते २०१७-१८ करीता कंत्राट देण्यात आले आहे. त्यानुसार सदर मत्स्यपालन संस्थेद्वारे मासेमारी करण्यात येत आहे.

जलाशयाची दि. ८/७/२०१७ रोजी उपविभागीय अभियंता यांनी प्रत्यक्ष पाहणी केली असता जलाशयाचे पिचींग व्यवस्थित असून ते उखडल्याचे निदर्शनास आलेले नाही.

(३) उपविभागीय अभियंता यांनी प्रत्यक्ष जलाशयाची पाहणी केली असता पिचींग उखडले नसल्याचे आढळले. त्यामुळे चौकशी करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गडचिरोली शहरातील तलाव खोलीकरणाबाबत

**(४२) ३३५१० (१०-०८-२०१७). श्री.मितेश भांगडिया :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली शहरातील तलावाचे खोलीकरणातून निघणाऱ्या मातीची साठवणूक तलाव परिसरातच करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, झालेल्या तलावाचे खोलीकरण व साठवणूक केलेल्या मातीच्या प्रमाणामध्ये मोठी तफावत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०७-११-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे. सदर तलाव हा गडचिरोली शहरात असल्यामुळे तलावातील साठलेला गाळ साठविण्याकरिता पर्यायी जागा उपलब्ध नाही.
(२) होय, शेतकऱ्यांनी शेतीच्या कामाकरीता गाळ नेल्यामुळे व काही गाळ या कामादरम्यान रॅम्पकरीता वापरल्यामुळे तफावत आहे.
(३) शेतीच्या कामास्तव तलावातील गाळ विनामूल्य शेतकऱ्यांना देण्याचे शासनाचे धोरण असून त्यानुषंगाने शेतकऱ्यांनी स्वखर्चाने ट्रॅक्टरव्दारे शेतीच्या कामाकरिता गाळ नेला असल्याने शासनास आर्थिक नुकसान झालेले नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत

**(४३) ३३५५४ (१०-०८-२०१७). श्री.विक्रम काळे : तारांकित प्रश्न क्रमांक १८७६८ ला दिनांक ७ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती/भटक्या जमाती व इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील विमुक्त जातीच्या आश्रमशाळेतील कार्यरत लिपीक / सेवक / कामाठी / स्वयंपाकी / वसतिगृह अधिक्षक /प्रयोगशाळा सहाय्यक/ परिचर/ नाईक इत्यादी शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निर्णयानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१७-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबद्ध पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार या विभागाने शासनपत्र दि. १०/०३/२०१७ अन्वये ज्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयाने याचिकाकर्ता कर्मचाऱ्यांना कालबद्ध पदोन्नती योजनेचा लाभ देण्याबाबतचे निर्देश दिले असतील अशा कर्मचाऱ्यांची वैयक्तिक पात्रता शालेय शिक्षण विभागाच्या दि. ३०/०४/१९९८ च्या शासन निर्णयानुसार तपासून जर याचिकाकर्ता कर्मचारी कालबद्ध पदोन्नती योजनेस पात्र ठरत असल्यास त्यांना सदरहू योजनेचा लाभ देण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

---

## उस्मानाबाद जिल्हयातील हमालांच्या मागण्याबाबत

**(४४) ३३७०४ (११-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उस्मानाबाद जिल्हयातील १०० हून अधिक हमालानी दिनांक ६ ऑगस्ट, २०११ च्या शासन निर्णयातील निर्देशानुसार दरमहा नियमित माथाडी मंडळाने निश्चित केलेल्या दराने मजूरी व लेव्ही न भरल्याने १८/२०१२ वर कंत्राटे रद्द करणे, माथाडी मंडळाने निश्चित केलेल्या दराने हमाली व लेव्ही माथाडी मंडळाकडे पाठवणे, या मागण्यांकरिता माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान जिल्हाधिकारी उस्मानाबाद कार्यालयासमोर बेमुदत उपोषण केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त हमालांच्या मागण्यासंदर्भात शासनस्तरावर कोणता निर्णय घेण्यात आला आहे काय,
(३) असल्यास, त्याचे स्वरूप काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (०७-११-२०१७)** : (१) होय, हे खरे आहे.

उस्मानाबाद जिल्हयातील गोदाम रक्षकाने माथाडी मंडळाचे दि. ०१/०८/२०१२ च्या दरपत्रकानुसार बिले सादर न केल्यामुळे दि. १५/०५/२०१७ रोजी जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांचे कार्यालयासमोर बेमुदत धरणे आंदोलन सुरु केले.

(२), (३) व (४) उस्मानाबाद जिल्हयातील शासकीय धान्य गोदामातील हमालांची थकित हमाली व त्यावरील लेव्हीच्या फरकाची रक्कम थकीत महसूलाप्रमाणे वसूल करावी अशी मागणी शासकीय धान्य गोदाम हमाल पंचायत यांनी मंडळाकडे केल्यानूसार मंडळाने माथाडी अधिनियमाच्या कलम १३ (५) अंतर्गत मजूरी व लेव्हीची थकीत रक्कम जमीन महसुलाप्रमाणे वसूल का करण्यात येऊ नये अशा आशयाची नोटीस जिल्हा पुरवठा अधिकारी उस्मानाबाद यांना दि. ०५/०९/२०१७ रोजी पाठविली असून त्या संदर्भातील सुनावणी मंडळमार्फत सूरू असून वसूलीची पुढील कायदेशीर प्रक्रिया सुरु आहे.

याबाबत, अन्न नागरी पुरवठा विभागाने कळविल्यानुसार राज्यातील सर्व जिल्हयातील शासकीय गोदामांमध्ये हमाल कंत्राट निश्चित करतांना माथाडी मंडळाने घोषित केलेल्या दराप्रमाणे आधारभूत दर देण्याबाबत कार्यवाही सुरु आहे. सर्व हमाल कंत्राटे ही माथाडी मंडळाने घोषित केलेल्या दराप्रमाणे उस्मानाबाद जिल्हयातील हमाल कामगारांना दर मिळतील.

---

**ठाणे जिल्हयातील वैतरणेचे १२ टी.एम.सी पाणी गोदावरीत वळविण्याबाबत**

**(४५) ३४०५७ (१०-०८-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर** : सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्हयातील वैतरणेचे १२ टि.एम.सी. पाणी गोदावरीत वळविण्यासाठी जलतज्ञ शंकरराव नागरे आणि इतरांनी मा.राज्यपालांना निवेदन देवून विनंती केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवेदनाची दखल घेऊन मराठवाडयातील जनतेला दिलासा देण्यासाठी वैतरणेचे १२ टि.एम.सी. पाणी गोदावरीत वळविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (१०-११-२०१७) :** (१) सदर पत्र शासनस्तरावर प्राप्त झाले नाही.

(२) शासनाचे दि. १४/०३/२०१२ चे पत्रानुसार २८.५० दलघमी (१ टीएमसी) वैतरणा सॅडल डॅमच्या एका बाजूने दारे बसवून गोदावरी खोऱ्यात वळविण्यास काहीअटींच्या अधीन राहून मान्यता दिलेली आहे.

सद्य:स्थितीत वैतरणा वळण योजनेचा समावेश दमणगंगा-वैतरणा-गोदावरी लिंक योजना (वाघ/वाल-अप्पर वैतरणा-कळवा-देवनदी लिंक) या राज्यांतर्गत नदी जोड योजनेमध्ये राष्ट्रीय जलविकास अभिकरणाने केलेला असून याद्वारे १६ दलघमी (०.५६ टीएमसी) पाणी वळविण्याचे प्रस्तावित आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण विभागामध्ये असलेल्या संगणक निदेशक पदाच्या वेतनश्रेणीबाबत

**(४६) ३४१८८ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यामध्ये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण विभागामधील संगणक निदेशक पद दिनांक ३१ जुलै, १९९७ ला (१४००-२६००) वेतनश्रेणीत निर्मित झाले असूनही संगणक निदेशक पदांना सुधारीत वेतनश्रेणीचा दिनांक १७ जानेवारी, २०१४ रोजीचा शासन निर्णय लागू झाला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, संगणक निदेशक पदांना सुधारीत वेतनश्रेणी मिळण्यासाठी संचालकांनी शासनास क्र. ४/आस्था/२००५/(२३५), दिनांक १६ एप्रिल, २००५ रोजी प्रस्ताव सादर केला असून संगणक निदेशक पदांना विधानसभा आश्वासन १०६८ नुसार सुधारीत वेतनश्रेणी (५५००-९०००) लागू करणे आवश्यक असल्याचे संचालकाने शासनास कळविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दिनांक २५ जुलै, २००७ च्या पदाच्या आढाव्यात संगणक निदेशक पद (१४००-२६००) वेतनश्रेणी दर्शविण्यात आली असून राज्य वेतन

सुधारणा समिती २००८ मा.हकीम यांनी सैनिकी शाळेतील संगणक निदेशकांना (Pay Band - २, ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००) प्रस्तावित केले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, संगणक निदेशक पद दिनांक ३१ जुलै, १९९७ ला निर्मित झाले असून त्याच शासन निर्णयामध्ये निर्माण झालेल्या निदेशक प्रमाणपत्र अभ्यासक्रम (१२००-२०४०) यांना सुधारीत वेतनश्रेणी (४५००-७०००) लागू केली आहे, हे खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राज्यातील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण विभागामध्ये असलेल्या संगणक निदेशक पदाच्या वेतनश्रेणीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (१८-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

मात्र सुधारित वेतनश्रेणीचा सदर शासन निर्णय दिनांक १७ जानेवारी २०१४ नसून दिनांक १७ जानेवारी, २००४ असा आहे.

(२) होय, हे खरे आहे.

तथापि, संचालकांच्या दिनांक १६/४/२००५ च्या प्रस्तावात विधानसभा आश्वासन १०६८ चा उल्लेख नाही.

(३) होय,

महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन), नियम २००९ मधील पृष्ठ क्र. ३६८ शालेय शिक्षण व क्रीडा विभाग अनु. क्र. १३८ संगणक निदेशक विद्यमान वेतनश्रेणी ४५०० (Fixed) सुधारित वेतन संरचना ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४३०० अशी लागू करण्यात आली आहे.

(४) होय, हे खरे आहे.

(५) व (६) वित्त विभाग महाराष्ट्र शासन नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम २००९ मधील पृष्ठ क्र. १५१ उच्च व तंत्र शिक्षण विभाग अ.क्र ११९ मध्ये संगणक निदेशक पदाची सुधारित वेतनश्रेणी रु. ९३००-३७८०० ग्रेड वेतन ४२००/- अशी लागू करण्यात आली आहे.

---

## दामदुप्पट करुन देण्याचे आमिष दाखवून दोन व्यक्तींनी महिलेची फसवणूक केल्याबाबत

**(४७) ३४२२१ (११-०८-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जादूटोणाच्या माध्यमातून दामदुप्पट करुन देण्याचे आमिष दाखवून भडगाव (जि.जळगाव) येथील दोन व्यक्तींनी विरार (जि.पालघर) येथील महिलेची साडेसात लाख रुपयांची फसवणूक केली असल्याचे दिनांक १३ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यशवंतनगर, भडगाव येथील दोन आरोपींना स्थानिक गुन्हे शाखेच्या पथकाने अटक केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आरोपींवर कोणता गुन्हा दाखल करण्यात आला आहे, त्यांचेकडून मुद्देमालासह रक्कम हस्तगत करण्यात आली आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-११-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

परंतु यातील फिर्यादी महिला ही विरार जि.पालघर येथील नसून ती मिरारोड येथे राहणारी आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) सदर घटनेबाबत ठाणे ग्रामीण जिल्ह्यातील मिरारोड पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. १९२/२०१७ भा.दं.वि. कलम ४२०, ३८०, २४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला असून आरोपींकडून एकूण रु. ४,६०,०००/- रोख मुद्देमाल रक्कम हस्तगत करण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिकेच्या खाजगी विनाअनुदानित शाळांना अनुदान देणेबाबत

**(४८) ३४२३९ (११-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिका अंतर्गत ४२ खाजगी विनाअनुदानित शाळांना १५ ते २० वर्षे पूर्ण होऊनही अनुदान मिळाले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या ४२ शाळांचे अनुदान मंजूर न करण्याची कोणती कारणे आहेत,

(३) असल्यास, सदर ४२ शाळांप्रमाणेच अन्य दोन शाळांना मुंबई महापालिकेने अनुदान मंजूर केले, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, एकाच प्रकारातील शाळांमध्ये भेदभाव का करण्यात आला व सदर ४२ शाळांना महानगरपालिकेच्यावतीने अनुदान केव्हा देण्यात येईल,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१६-११-२०१७) :** (१) व (२) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या शिक्षण विभागाच्या अखत्यारीत असणाऱ्या अनुदानित शाळांना शासनाकडून ५०% व महानगरपालिकेचे ५०% असे एकूण १००% अनुदान देण्यात येते. तथापि, सन २००१-२००२ या शैक्षणिक वर्षापासून महानगरपालिकेने त्यांच्या क्षेत्रात मान्यता दिलेल्या खाजगी प्राथमिक शाळांचे अनुदान शासनाच्या अनुदानासाठी ग्राहय धरले जाणार नसल्यामुळे सन २००४ नंतर महानगरपालिकेने मान्यता दिलेल्या कोणत्याही शाळेस महानगरपालिकेमार्फत अनुदान मंजूर करण्यात आलेले नाही.

या दरम्यान अनुदानासाठी एकूण ४२ शाळांनी अर्ज केले आहेत, त्यापैकी बालमोहन शाळेची मान्यता सन १९४२ पासूनची असल्याने, या शाळेस महानगरपालिकेच्या शिक्षण समितीच्या मंजुरीने ५०% अनुदान सुरु करण्यास मंजुरी दिलेली आहे.

तसेच, दिनांक १७/०२/२०१० मध्ये महानगरपालिकेने घेतलेल्या निर्णयानुसार, सन २००१-२००३ या कालावधीमध्ये महानगरपालिकेने ज्या खाजगी शाळांना मान्यता दिलेली आहे अशा ३३ शाळांनाच

महानगरपालिकेच्या अटीसापेक्ष अनुदान मंजुर करण्यात आले आहे, तसेच सदर निर्णय यापुढे इतर कोणत्याही शाळेला लागू होणार नसल्याचे महानगरपालिकेमार्फत निश्चित करण्यात आले आहे.

(३) सदर ४२ शाळांपैकी दादर (पश्चिम) येथील बालमोहन या मराठी माध्यमाच्या प्राथमिक शाळेची मान्यता सन १९४२ पासूनची असल्याने, या शाळेस ५०% अनुदान मंजूर करण्याचा निर्णय बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत घेण्यात आला आहे.

(४) व (५) बृहन्मुंबई महानगरपालिकेने सन २००१-२००२ नंतर मान्यता दिलेल्या शाळांना शासनाकडून ५०% अनुदान मंजूर केले जाणार नसल्याबाबतचा शासन निर्णय असल्यामुळे, अशा शाळांना अनुदान मंजूर केल्यास येणाऱ्या आर्थिक दायित्वाची संपूर्ण जबाबदारी महानगरपालिकेवर पडणार आहे.

त्यामुळे बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील खाजगी व्यवस्थापकांनी (इंग्रजी माध्यम वगळून) अनुदानासाठी अर्ज केलेल्या ४२ शाळांना शासनाकडून ५०% अनुदानासाठी देण्याबाबत शासनाची भूमिका कळविण्याबाबत तसेच, या शाळांचे अनुदान प्रस्ताव शासनाचे अनुदान सूत्र लागू करण्यासाठी, मुल्यांकनाचे निकष निश्चित केल्याप्रमाणे मुल्यांकन/पडताळणी करुन शासनाकडे पाठवावे किंवा कसे अथवा पुढील अनुदान मुल्यांकन प्रक्रियेत बृहन्मुंबई महानगरपालिका परिक्षेत्रातील शाळांना ऑनलाईन मुल्यांकन अर्ज सादर करणेस अनुमती देणे याबाबत शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे अभिप्राय मागविण्यात आले होते.

त्याअनुषंगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभागामार्फत प्राप्त अभिप्रायानुसार, सन २००१-२००२ या शैक्षणिक वर्षापासून बृहन्मुंबई महानगरपालिकेने मान्यता दिलेल्या शाळांना शासनाच्या अनुदानासाठी ग्राह्य धरले जाणार नसल्याने बृहन्मुंबई महानगरपालिकेस अनुदान मिळणार नाही.

---

## वैद्यकीय महाविद्यालयातील प्रवेश प्रक्रियेत मान्यता नसलेल्या महाविद्यालयांचा समावेश केल्याबाबत

**(४९) ३४५३६ (१९-०८-२०१७). श्रीमती स्मिता वाघ** : सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वैद्यकीय महाविद्यालयातील प्रवेश प्रक्रिया दिनांक २८ जूनपासून सुरु झाली असून वैद्यकीय परिषदेने जाहीर केलेल्या

महाविद्यालयांच्या यादीत ७ महाविद्यालयांना वैद्यकीय परिषदेची मान्यता नसतानाही त्यांचा समावेश या प्रवेश प्रक्रियेत करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आयत्या वेळी परवानगीची धावपळ व अभ्यासक्रमाला उशिराने सुरुवात होणे व परवानगी न मिळाल्यास विद्यार्थ्यांमध्ये गोंधळ निर्माण होणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी कायमस्वरूपी धोरण आखून सुद्धा प्रवेश प्रक्रियेत अशा प्रकारे गोंधळ होत असतो त्यामुळे शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (०२-११-२०१७)** : (१) हे खरे नाही. भारतीय आयुर्विज्ञान परिषदेची मान्यता नसलेल्या महाविद्यालयांचे प्रवेश करण्यात आलेले नाहीत.

(२) हे खरे नाही.

(३)प्रश्न उद्भवत नाही.

(४)प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पत्रकारांच्या विविध मागण्यांबाबत

**(५०) ३४६५२ (२३-१०-२०१७). श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक २७८४३ ला दिनांक १५ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देशातील १६ राज्यांमध्ये पत्रकारांना पेन्शन योजना लागू असून राज्यातील पत्रकारांना पेन्शन योजना लागू करण्यासाठी व इतर मागण्याबाबत लोकप्रतिनिधींनी शासनास माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान पत्र दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात विधिमंडळात चर्चा होवूनही तसेच वेळोवेळी आश्वासने व पत्रव्यवहार करुनही कोणतीही कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पत्रकार हल्ला विरोधी कायद्याची प्रक्रिया तात्काळ पुर्ण करणे, मजेठीया आयोगाच्या शिफारशी तात्काळ लागू करणे, आरोग्य विमा लागू करणे, पत्रकारांच्या पाल्यांना शैक्षणिक सुविधा मिळणे इत्यादीबाबत वारंवार मागणी करुनही कार्यवाही होत नसल्याने पत्रकारांमध्ये असंतोष पसरला असून यासंदर्भात शासन तात्काळ निर्णय घेणार आहे काय,
(४) असल्यास, याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२४-११-२०१७) :** (१) होय.
(२) हे खरे नाही.

ज्येष्ठ पत्रकारांप्रती सामाजिक भावनेतून वयोवृध्द व ज्येष्ठ पत्रकारांना त्यांच्या कार्याचा सन्मान म्हणून आचार्य बाळशास्त्री जांभेकर ज्येष्ठ पत्रकार सन्मान योजनेंतर्गत दरमहा ठराविक रक्कम देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.
(३), (४) व (५) होय.

पत्रकार हल्ला विरोधी कायद्याचे विधेयक मा.राज्यपाल यांच्यामार्फत मा.राष्ट्रपतींच्या मान्यतेसाठी केंद्र शासनाकडे पाठविण्यात आले आहे.

मजेठीया आयोगाची अंमलबजावणीबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागांतर्गत कामगार आयुक्त, महाराष्ट्र यांच्यामार्फत कार्यवाही सुरु आहे.

महात्मा जोतिबा फुले जीवनदायी आरोग्य विमा योजनेमध्ये अधिस्विकृतीधारक पत्रकार व त्यांचे कुटुंबिय यांचा समावेश करण्यात आला आहे. तसेच अधिस्विकृती नसलेल्या पत्रकारांचा समावेश करण्याबाबत विविध शक्यतांची तपासणी करण्यात येत आहे.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**नागपूर.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण : शासकीय मुद्रणालय, नागपूर